**महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाच्या कल्याणकेंद्र इमारतीच्या बांधकामासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संघटना १५२४ /प्र.क्र.१२ /१६-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ मार्च, २०२४

<u>वाचा</u> : १)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. संघटना १५१५/प्र.क्र.१७७/१६-अ,दि.०१.०४.२०१७
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. संघटना १५१७/प्र.क्र.२०२/१६-अ,दि.२४.०३.२०२३
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. संघटना १५१७/प्र.क्र.२०२/१६-अ,दि.२८.०३.२०२३
४) महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ यांचा दि.५.१.२०२४ रोजीचा प्रस्ताव

<u>प्रस्तावना</u>-

महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघास शासनाच्या सेवेतील अधिकारी मुंबई येथे शासकीय कामकाजानिमित्त आल्यानंतर त्यांच्या निवासाची व विश्रामाची सोय करण्याकरिता, तसेच महासंघाच्या सदस्यांकरिता विविध प्रशिक्षण व मार्गदर्शनपर शिबिरे आयोजित करण्याकरिता कल्याणकेंद्र उभारण्यासाठी मौजे वांद्रे, ता. अंधेरी, जि. मुंबई उपनगर येथील स.नं.३४१, न.भू.क्र. ६२९ मधील “ई”, क्षेत्र १३८१ चौ.मी. क्षेत्राचा भूखंड रूपये १/- (अक्षरी रूपये एक) नाममात्र प्रतीवर्षी भाडयाने ३० वर्षाच्या भाडेपट्टयाने मंजूर करण्यात आला आहे. महासंघाच्या प्रस्तावित कल्याणकेंद्राच्या बांधकामासाठी शासनाकडून विशेष बाब व एक वेळची मदत म्हणून संदर्भ क्र.१ अन्वये ₹ १० कोटी (रुपये दहा कोटी फक्त) इतका निधी उपलब्ध करून देण्यास, विहित मार्गदर्शक तत्वे, अटी व शर्ती तसेच कार्यपध्दतीच्या अधिन राहून वितरीत करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे.

कल्याणकेंद्राच्या उभारणीकरिता आवश्यक असलेल्या सर्व परवानग्या, ना-हरकत दाखले, तसेच संबंधित सक्षम स्थानिक प्राधिकरणाकडून बांधकाम आराखड्यासह सर्व बाबींची मंजूरी / मान्यता व पर्यावरण विभागाकडून आवश्यकतेनुसार मंजूरी प्राप्त करुन त्या सर्व कागदपत्रांच्या प्रती जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडे सादर केल्यानंतर बांधकाम मान्यता देणे व निधी वितरीत करणे अपेक्षित होते. महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ यांना बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून दिनांक २७.०५.२०२२ रोजीचे बांधकामासाठी प्रारंभ प्रमाणपत्र (CC) तसेच अन्य कागदपत्रे सादर केल्यानंतर संदर्भ क्र.३ अन्वये सदर प्रकल्पाचा निधी वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर व संनियंत्रण समिती सदस्य तथा मुंबई उपनगर येथील महासंघाचे उपाध्यक्ष यांचे संयुक्त खात्यातून खर्च करण्यात आला असून, त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी मुंबई उपनगर यांनी शासनास सादर केले आहे.

आता महासंघाने संदर्भ क्र. ४ अन्वये, कल्याणकेंद्र इमारतीसाठी शासनाकडून देण्यात आलेल्या १३८१ चौ.मी. भूखंडावर, ७८६०.२३ चौ.मी. (८४५७६.०७ चौ. फूट) इतक्या बांधकाम आराखड्यास बृहन्मुंबई महानगरपालिकेची मंजूरी प्राप्त असून, त्यामध्ये २ बेसमेंट व जी+८ मजले

उभारणीचे काम सुरु करण्यात आल्याबाबत नमूद केले आहे. तसेच कल्याणकेंद्राच्या स्थापत्य कामाच्या एकूण रु.४८,९१,८९,०५२/- (रूपये अठ्ठेचाळीस कोटी एक्क्यान्नव लाख एकोण नव्वद हजार बावन्न) इतक्या तसेच विद्युत कामाच्या मुख्य अभियंता (विद्युत) यांनी एकूण रु.११,४४,९२,६३७/- (रूपये अकरा कोटी चव्वेचाळीस लाख ब्यान्नव हजार सहाशे सदतीस) अशा एकूण रु. एकूण रु. ६०,३६,८१,६८९/- (रुपये साठ कोटी छत्तीस लाख ऐक्याऐंशी हजार सहाशे एकोणनव्वद फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक मंजूरी दिली आहे. सदर कल्याणकेंद्राच्या बांधकामाच्या आवश्यक चटईक्षेत्रासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेला नगरविकास विभागाच्या ५०% सवलतीच्या आधारे रु. ३,९८,९४,५००/- इतके शुल्क अदा केलेले आहे, याव्यतिरिक्त रु. २०,८१,३५,२०२/- इतके शुल्क (दि. १ एप्रिल, २०२३ रोजीच्या रेडीरेकनरनुसार निर्धारित विवरणपत्र सोबतप्रमाणे) अद्याप देय आहे. त्याचबरोबर अतिरिक्त चटईक्षेत्र (टीडीआर) खरेदीसाठी अंदाजे रु. ७,००,००,०००/- असे एकूण रु. २७,८१,३५,२०२/- इतके शुल्काची रक्कम अदा करणे आवश्यक आहेत. त्यामुळे सदर प्रकल्प उभारणीस शासनाने यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेल्या रु.३४ कोटी ऐवजी अंदाजे रु.८८ कोटी इतका खर्च होणार असल्याची बाब निदर्शनास आणण्यात आली आहे. त्यापैकी महासंघाकडे वर्गणी व आर्थिक योगदानातून रु.८ कोटी इतकी रक्कम जमा झाली असून, शासनाने रु.१० कोटी इतका दिलेला निधी अपुरा पडत असल्याने, आता रु.२० कोटी अतिरिक्त निधी शासनाने उपलब्ध करुन द्यावा, अशी विनंती केली आहे.

महासंघास शासनाने यापूर्वी दिलेला निधी रु.१० कोटी हा एक वेळचे अर्थसहाय्य म्हणून मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेनुसार वितरीत केला आहे. सबब, महासंघास प्रकल्पासाठी आवश्यक असलेल्या अतिरिक्त निधी प्रस्ताव दि.१६.०३.२०२४ रोजीच्या मा.मंत्रिमंडळ बैठकीत सादर करण्यात आला असून, त्यास मा.मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. सदर मान्यतेनुसार महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ यांच्या कल्याण केंद्र उभारणीच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे व प्रकल्पास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ यांना मौजे वांद्रे, ता.अंधेरी, जि.मुंबई उपनगर येथे सर्व्हे क्र. ३४१, न.भू.क्र.६२९ मधील "ई" क्षेत्र येथे उभारण्यात येत असलेल्या कल्याणकेंद्र इमारतीसाठी संदर्भ क्र. ४ अन्वये महासंघाने केलेल्या विनंतीस अनुसरुन, सदर बांधकामासाठी आता नव्याने एकूण रु.८८.१७ कोटी इतका खर्च अपेक्षित असल्याने, त्यापैकी रु.२०.०० कोटी इतका अतिरिक्त निधी मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघास कल्याण केंद्राच्या बांधकामासाठी मागणी क्र.अे-४, मुख्य लेखाशीर्ष-२०७०-इतर प्रशासनिक सेवा, उप मुख्य लेखाशीर्ष ००, गौणशीर्ष ८०० इतर खर्च, गट शीर्ष (००) उपगट शीर्ष (००) (१०) महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाच्या कल्याण केंद्र इमारतीच्या बांधकामासाठी सहाय्यक अनुदान (योजनांतर्गत) (२०७० ० ८९१), उद्दीष्ट- ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध निधीतून रू. २०कोटी (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) इतका निधी खालील अटी शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सदर प्रकल्यासाठी संदर्भ क्र. १ अन्वये संनियंत्रण समिती व व्यवस्थापन समिती गठीत करण्यात आली असून, सदर समितीच्या मार्गदर्शन व सहाय्याने प्रकल्प उभारण्यात यावा.

२. सदर प्रकल्पासाठी निवासी उप जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर योजने अंतर्गत बांधकामाशी संबंधित साहीत्य व अन्य सामग्री संनियंत्रण समितीच्या सल्लामसलतीने शासन कार्यपध्दतीप्रमाणे निविदा प्रक्रियेचा अवलंब करुन खरेदी करावे.

४. प्राप्त झालेल्या निविदामधून उचित दर नोंदविणारे, विश्वासपात्र व अनुभवी कंत्राटदार व प्रकल्पाचे आर्किटेक्ट यांचे बरोबर एकत्रितपणे चर्चा करुन बांधकामाच्या निविदाबाबत, दर्जाशी तडजोड न करता, खर्च कमी करण्याबाबत प्रयत्न करावा.

५. कल्याणकेंद्राचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर वा आंशिक बांधकामानंतर (स्थानिक सक्षम प्राधिकारी यांनी याबाबत दिलेल्या मंजूरी/परवानगी/बांधकाम आराखड्याची मान्यता याच्या अधीन राहून) इमारतीचा वापर सुरु करण्यापूर्वी भोगवटा प्रमाणपत्र (O.C.) महासंघाने मिळविणे आवश्यक राहील.

६. भोगवटा प्रमाणपत्र (O.C.) मिळविल्याशिवाय कोणत्याही परिस्थितीत सदर इमारतीचा वापर करणे अनुज्ञेय राहणार नाही. त्या शिवाय इमारतीचा वापर सुरु केल्यास त्यामुळे उद्भवणा-या सर्व बाबींसाठी महासंघ व त्यांचे सर्व पदाधिकारी जबाबदार राहतील.

७. संनियंत्रण समितीने देखील सदर इमारतीचा वापर भोगवटा प्रमाणपत्र मिळविल्यानंतरच करण्यात येत आहे याची खातरजमा करावी.

८. कल्याणकेंद्राच्या इमारतीचा वापर करण्यास स्थानिक सक्षम प्राधिकारी यांचेकडून ना हरकत प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर सदर इमारत महासंघाच्या मालकीची राहील.

९. कल्याणकेंद्राच्या इमारतीचा वापर ज्या प्रयोजनाकरिता भूखंड वाटप करण्यात आला आहे त्याच प्रयोजनाकरिता होत आहे/करण्यात येत आहे याची जबावदारी सदर व्यवस्थापन समितीची असेल.

१०. कल्याणकेंद्राच्या बांधकामानंतर महासंघास तात्काळ उत्पन्न मिळणे सुरु होईल अशा स्वरुपाचे बांधकाम पहिल्या टप्प्यात करावे.

११. कल्याणकेंद्र इमारतीच्या अनुज्ञेय वापराबाबत व्यवस्थापन समिती मध्ये मतभेद उद्भवल्यास व्यवस्थापन समितीचे अध्यक्ष या नात्याने जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी सविस्तर अहवाल आपल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायासह मा. मुख्य सचिव यांचेकडे तात्काळ सादर करावा व या संदर्भात शासनाचे आदेश प्राप्त करुन घ्यावेत.

१२. प्रकल्पाचा निधी जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा व महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ यांचे मुंबई उपनगर येथील उपाध्यक्ष यांच्या खालील संयुक्त खात्यात जमा करण्यात यावा.

खातेदाराचे नाव - महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ कल्याणकेंद्र

(Maharashtra Rajya Rajpatrit Adhikari Mahasangh Kalyankendra)

बॅकेचे नाव व शाखा - स्टेट बँक ऑफ इंडिया, वांद्रे (पूर्व) मुंबई

(State Bank of India, Govt.Colony, Bandra (East), Mumbai

खाते क्रमांक - ४१७८७४६२१३-६ ( 4178746213-6)

१३. सदर संयुक्त खात्यात शासन अर्थसहाय्य तसेच महासंघाचा हिस्सा जमा करण्यात यावा.

१४. सदर खात्यातून रक्कम वितरीत करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या मान्यतेने आहरण व संवितरण अधिकारी यांनी महासंघास प्रकल्पासाठी निधी वितरीत करावा.

१५. सदर संयुक्त बँक खाते बंद करण्यात आल्यास सदर खात्यावरील व्याजाची रक्कम तसेच शिल्लक रक्कम याचा ताळमेळ घेऊन निश्चित होणारी रक्कम जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी शासकीय लेख्यामध्ये तात्काळ जमा करावी.

१६. सदर संयुक्त बँक खात्यात दीर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही या दृष्टीने तात्काळ विनियोगासाठी आवश्यक असेल त्याचवेळी कोषागारातून निधी आहरीत करण्यात यावा.

१७. या योजने अंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या निधीचा विनियोग योग्यरीत्या न झाल्यास ती शासकीय नियमानुसार व बंधपत्रातील अटी व शर्तीनुसार व्याजासहीत वसूल करण्यात येईल.

१८. महासंघाने मंजूर करण्यात आलेला निधी हा प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद बाबींसाठी समाविष्ट मंजूर घटकांकरीता जिल्हाधिकारी यांच्या मान्यतेने खर्ची घालावा.

१९. मंजूर करण्यात आलेल्या निधीबाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरिक्षण सनदी लेखापाल यांच्याकडून करण्यात यावे व या संबंधीची माहिती जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्या मार्फत शासनास सादर करावी.

२०. महासंघास मंजूर निधीमधून प्राप्त झालेल्या स्थावर/निमस्थावर अशा सर्व मिळकतीचे लेखे लेखापरिक्षणास आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावेत.

२१. महासंघाला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या मिळकतीतील वाढीची यादी विल्हेवाट लावण्यापूर्वी शासनाची मान्यता घेणे महासंघास बंधनकारक राहील.

२२. महासंघाने उपलब्ध करुन दिलेले निधी उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकरी, मुंबई उपनगर यांचेमार्फत शासनास सादर करावे. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याखेरीज अतिरिक्त निधी वितरीत केला जाणार नाही.

२३. मंजूर प्रकल्पाची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांची राहील.

२४. महासंघाने कार्यवृत्त-पुस्तक, सदस्यांची नोंदवही, लेखा पुस्तके आणि प्रमाणके आणि इतर सर्व कागदपत्रे, यासंबंधात तपासणीसाठी खुली ठेवावीत.

२५. महासंघाने आपले वार्षिक विवरणपत्र आणि लेखापरीक्षित लेख्यांची प्रत माहितीस्तव शासनास सादर केली पाहिजे.

२६. या संदर्भात उदभवणा-या तक्रारी व अन्य वादाच्या बाबीस व्यवस्थापन समिती जबाबदार असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२४०३१६१३४४३५४५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUMANT NAMDEORAO BHANGE

Digitally signed by SUMANT NAMDEORAO BHANGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=17b7f71196a30f5dadd3859d04bf654ed8b2dd1177972936de56dcefe4daa38e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1FB1B48850CC3E5A74179F14C10EC607D89BEA3022F75E225829CC7525E64558, cn=SUMANT NAMDEORAO BHANGE
Date: 2024.03.16 13:54:01 +05'30'

**(सुमंत भांगे)**
**सचिव (साविस),महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.
२. सर्व सन्माननीय विधान परिषद/ विधानसभा व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई -४०० ०३५.
४. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

५. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. सरचिटणीस, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, तळमजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.
१२. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा), विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
१५. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई- ४०० ०३२.
१६. सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई-४०० ०३२.
१७. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
२०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, नवीन प्रशासन भवन, पहिला माळा, मुंबई-४०० ०३२.
२१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
२२. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
२३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२४. निवासी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, प्रशासकीय इमारत १० वा मजला, शासकीय वसाहत बांद्रा पूर्व, मुंबई ४०० ०५१.
२५. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
२६. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये, महाराष्ट्र राज्य.
२७. सरचिटणिस, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, मुंबई
२८. निवड नस्ती/कार्या.१६-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.